**अंगणवाडी सेविका, मदतनीस व मिनी अंगणवाडी सेविका यांच्या निवडीकरिता असलेल्या निवड समितीची पुर्नरचना करणेबाबत...**

# महाराष्ट्र शासन

महिला व बाल विकास विभाग
शासन निर्णय क्र. एबावि-२००९/प्र.क्र.७८/का-६
नवीन प्रशासन भवन, ३ रा मजला,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- ७ मे, २०१०.

**वाचा :-** १. शासन निर्णय, महिला व बाल विकास विभाग क्र. एबावि-१०९५/प्र.क्र.८९/का-६, दिनांक १०.२.१९९६
२. शासन निर्णय, महिला व बाल विकास विभाग क्र. एबावि-१०९५/प्र.क्र.८९/का-६, दिनांक १८.३.१९९६
३. शासन निर्णय, महिला व बाल विकास विभाग क्र. एबावि-१०९५/प्र.क्र.८९/का-६, दिनांक २८.१.१९९७
४. शासन निर्णय, महिला व बाल विकास विभाग क्र. एबावि-२००२/प्र.क्र.४१७/का-६, दिनांक १४.१.२००४
५. शासन निर्णय, महिला व बाल विकास विभाग क्र. एबावि-२००६/प्र.क्र.१८५/का-६, दिनांक ८.८.२००६
६. शासन निर्णय, महिला व बाल विकास विभाग क्र.एबावि-२००७/प्र.क्र.२५१/का-६,दिनांक १४.९.२००७
७. भारत सरकारच्या महिला व बाल विकास विभाग मंत्रालयाचे एफ नं. १-१४/२००६-सीडी-१, दिनांक २८.५.२००७ चे पत्र.
८. शासन निर्णय, महिला व बाल विकास विभाग क्र. एबावि-२००९/प्र.क्र.७८/का-६, दिनांक २७.१.२०१०

**प्रस्तावना :-** वाचा क्र. ७ येथील केंद्र शासनाच्या पत्रातील निर्देशानुसार वाचा क्र. १ ते ६ येथील शासन निर्णय अधिक्रमित करुन वाचा क्र. ८ येथील शासन निर्णयानुसार अंगणवाडी कर्मचा-यांच्या नियुक्तीसाठी निवड समिती गठीत करण्यात आली आहे. परंतु, लोकप्रतिनिधींकडून निवड समितीत सुधारणा करण्याची मागणी सातत्याने करण्यात येत आहे. त्यामुळे पुन्हा निवड समितीत सुधारणा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-** त्यास अनुसरुन समक्रमांकाच्या दिनांक २७.१.२०१० च्या शासन निर्णयात अंशतः सुधारणा करुन एकात्मिक बाल विकास सेवा योजनांतर्गत अंगणवाडी सेविका, मदतनिस व मिनी अंगणवाडी सेविका निवड समिती खालीलप्रमाणे पुर्नगठीत करण्यात येत आहे.

**१) मा. मंत्री, महिला व बाल विकास यांनी मान्यता दिलेली संबंधित तालुक्यातील व्यक्ती (बालके / महिलांशी संबंधित सामाजिक कार्य करणारी) - अध्यक्ष**

**२) ग्रामीण व आदिवासी प्रकल्पातील अंगणवाडी केंद्रासाठी संबंधित प्राथमिक आरोग्य केंद्रातील वैद्यकीय अधिकारी (नागरी प्रकल्पातील अंगणवाडी केंद्रांसाठी संबंधित प्रकल्प क्षेत्रातील किंवा नजिकच्या क्षेत्रातील महानगरपालिका / नगरपालिकेचे वैद्यकिय अधिकारी) - सदस्य**

**३) मा. मंत्री, महिला व बाल विकास यांनी मान्यता दिलेले संबंधित पंचायत समितीचे सदस्य (नागरी प्रकल्पाच्या बाबतीत संबंधित महानगरपालिका / नगरपालिकेचा सदस्य) - सदस्य**

**४) संबंधित प्रकल्पाचा बाल विकास प्रकल्प अधिकारी - सदस्य सचिव**

यापूर्वी प्रकल्पनिहाय निवड समिती गठीत करण्यात आली होती. परंतु, आता संबंधित तालुक्यातील ग्रामीण, आदिवासी व नागरी प्रकल्पांतील अंगणवाडी केंद्रातील सर्व मानधनी पदे भरण्यासाठी तालुकानिहाय निवड समिती गठित करण्यात येत आहे.

संबधित पालकमंत्र्यांनी संबंधित निवड समितीचे अध्यक्ष व अशासकीय सदस्यांची नांवे (पंचायत समिती / महानगरपालिका / नगरपालिका सदस्य) या शासन निर्णयाचे दिनांकापासून ३० दिवसांचे आत मा. मंत्री, महिला व बाल विकास, मंत्रालय, मुंबई यांचेकडे अंतिम मान्यतेसाठी सादर करावीत. सदरहू नावे ही ३० दिवसांच्या आत मा. मंत्री, महिला व बाल विकास यांचेकडे सादर न केल्यास, मा. मंत्री (महिला व बाल विकास) यांनी मान्य केलेली नांवे अंतिम राहील. संबंधित पालकमंत्र्यांनी शिफारस केलेल्या अध्यक्षांचे व अशासकीय सदस्यांचे नावामध्ये बदल करण्याचे अधिकार हे मा. मंत्री (महिला व बाल विकास) यांना राहील.

अनु. क्र. २ येथील सदस्य ज्या अंगणवाडी केंद्रातील पद भरावयाचे आहे, त्या अंगणवाडी केंद्राच्या क्षेत्रातील वैद्यकिय अधिकारी हे पदसिध्द सदस्य असतील.

शासन निर्णयानुसार थेट नियुक्तीबाबतची प्रकरणे प्रथम निकाली काढावीत व त्यानंतर उर्वरित अंगणवाडी सेविका, मदतनिस व मिनी अंगणवाडी सेविका यांची पदे तसेच सेवानिवृत्तीमुळे व अन्य कारणास्तव ही पदे रिक्त झाल्यानंतर ३० दिवसांच्या आत जाहिरात देऊन अर्ज मागविण्यात यावेत.

शैक्षणिक अर्हता, विधवा / परित्यक्त्या / घटस्फोटिता, जात, अनुभवाबाबतचे निश्चित गुण यासंबंधिचे सक्षम प्राधिका-याने दिलेल्या प्रमाणपत्राची पडताळणी करून उमेदवारनिहाय त्यांना मिळालेले निश्चित गुण यांची यादी मुलाखत घेण्यापूर्वी, ज्या ठिकाणी मुलाखती घेण्यात येणार आहेत तेथे नोटीस बोर्डावर, अर्ज केलेल्या किमान पाच उमेदवारांची स्वाक्षरी घेऊन लावण्यात यावी व अशी यादी नोटीस बोर्डावर प्रसिध्द केल्यापासून ३० दिवसांचे आत मुलाखती घेण्यात याव्यात. सदर निश्चित गुणांची यादी जाहिरातीनुसार अर्ज सादर करतांना त्यासोबत असलेल्या प्रमाणपत्रांच्या आधारेच तयार करण्यात यावी.

परंतु, जात पडताळणी, विधवा / परित्यक्त्या / घटस्फोटिता असल्याबाबतचे वैध प्रमाणपत्र जर मुलाखत सुरु होण्याचे एक तास आधी दाखल केले असल्यास, सदरहू प्रमाणपत्रांचा गुण देण्याकरिता विचार करण्यात यावा व अशाप्रकारे सुधारित यादी तात्काळ नोटीस बोर्डावर लावण्यात यावी व त्याशिवाय मुलाखती सुरु करण्यात येऊ नयेत.

उमेदवारांच्या मुलाखती प्रत्यक्ष तालूका मुख्यालयातच आयोजित करण्यात याव्यात. उमेदवारांची मुलाखत ज्या दिवशी घेण्यात येईल त्याच दिवशी संध्याकाळपर्यंत कार्यालयाच्या सूचना फलकावर निवड करण्यात आलेल्या उमेदवारांची निवड यादी प्राप्त गुणांसह घोषित करण्यात यावी व त्याच्या पुढील दिवशी सर्व नियुक्ती आदेश / पत्र जारी करण्यात यावेत. याबाबतची जबाबदारी संबंधित बाल विकास प्रकल्प अधिकारी यांची राहील.

वरील अटी व शर्तीप्रमाणे पदे रिक्त झाल्यानंतर ते भरण्याकरिता घालून देण्यात आलेल्या कालमर्यादेचे पालन करण्याची संपूर्ण जबाबदारी संबंधित सदस्य सचिव यांच्यावर राहील.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

सही /-
(ज. कि. मगरे)
सह सचिव

प्रति,
मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई
मा. मुख्यमंत्री व मा. उप मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
मा. मंत्री व मा. राज्यमंत्री (महिला व बाल विकास) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
सर्व मा. मंत्री व मा. राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
प्रधान सचिव, विधानसभा, विधानमंडळ सचिवालय, मुंबई
आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, रायगड भवन, नवी मुंबई.
आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
विभागीय आयुक्त, मुंबई, पुणे, नाशिक, औरंगाबाद, अमरावती, नागपूर
सचिव, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई
सचिव, सामाजिक न्याय, सांस्कृतिक कार्य व क्रिडा विभाग, मंत्रालय, मुंबई
सचिव, शालेय शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई
महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मुंबई.
सर्व जिल्हाधिकारी
सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद
सर्व जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी
सर्व बाल विकास प्रकल्प अधिकारी
सर्व उप मुख्य कार्यकारी अधिकारी (बाल कल्याण)
महिला व बाल विकास विभागातील सर्व उप सचिव / अवर सचिव व कार्यासने
निवड नस्ती (कार्यासन-६)